अपर पोलीस महासंचालक, प्रशिक्षण व खास पथके, महाराष्ट्र राज्य, मुंबई हे पद पुन:स्थापित करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**गृह विभाग**

शासन निर्णय क्रमांक : आयपीएस - १२०८ / प्र.क्र. २७७ / पोल -१

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२, दिनांक २४ ऑगस्ट, २००९.

वाचा :- १) शासन निर्णय, गृह विभाग, समक्रमांक, दिनांक १६ जुलै, २००९.

२) शासन आदेश, गृह विभाग, क्रमांक, आयपीएस-१७०९ / प्र.क्र.३१४ / पोल-१, दिनांक ११ ऑगस्ट, २००९.

३) पोलीस उप महानिरीक्षक(प्रशिक्षण), महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे अशा.प.क्र.प्रशि/आस्था.१/ पोमसं विशेष कृती/नविन पद/०९, दिनांक २१ ऑगस्ट, २००९.

**शासन निर्णय :**

उपरोक्त नमूद दिनांक १६ जुलै, २००९ रोजीच्या शासन निर्णयान्वये, राज्य पोलीस दलातील अपर पोलीस महासंचालक, प्रशिक्षण व खास पथके, महाराष्ट्र राज्य, मुंबई या पदाची एचएजी + रुपये ७५,५००-८०,०००/- या वेतनश्रेणीतील महासंचालक दर्जात श्रेणीवाढ करुन राज्यात महासंचालक, विशेष कृती, महाराष्ट्र राज्य, मुंबई हे श्रेणीवाढ केलेले महासंचालक दर्जाचे एक पद, संबंधित अधिकाऱ्याने त्या पदाचा प्रत्यक्ष कार्यभार स्वीकारल्याच्या दिनांकापासून, दिनांक ३१.०७.२००९ पर्यंत तात्पुरत्या स्वरुपात निर्माण करण्यात आले.

२. उपरोक्त नमूद दिनांक ११ ऑगस्ट, २००९ रोजीच्या शासन आदेशानुसार श्री.ए.के.शर्मा, भापोसे यांची अपर पोलीस महासंचालक, प्रशिक्षण व खास पथके, महाराष्ट्र राज्य, मुंबई या पदावर पदोन्नतीने नियुक्ती करण्यात आलेली असून, सदर पदाचा कार्यभार त्यांनी स्विकारलेला आहे. दिनांक १६ जुलै, २००९ रोजीच्या शासन निर्णयास अनुसरुन, राज्य पोलीस दलातील अपर पोलीस महासंचालक, प्रशिक्षण व खास पथके, महाराष्ट्र राज्य, मुंबई हे पद दिनांक ०१.०८.२००९ पासून पुर्वीप्रमाणे पुन:स्थापित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २००९०८२४१७२९५६००१ हा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने ,

( कैलास वि. बिलोणीकर )

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन, गृह विभाग.**

D:\new pol-1\UPGRADE&DOWNGRADE\GRCR 277.08

- मा.राज्यपाल यांचे सचिव
- मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
- मा.उपमुख्यमंत्री यांचे सचिव
- मा.मंत्री (गृह) यांचे खाजगी सचिव
- मा.राज्यमंत्री (गृह) (शहरे) यांचे खाजगी सचिव
- मा.राज्यमंत्री (गृह) (ग्रामीण) यांचे खाजगी सचिव
- मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहाय्यक
- अपर मुख्य सचिव (गृह) यांचे वरिष्ठ स्वीय सहाय्यक
- प्रधान सचिव (अपिल व सुरक्षा) यांचे स्वीय सहाय्यक
- प्रधान सचिव (विशेष), गृह विभाग यांचे वरिष्ठ स्वीय सहाय्यक
- महासंचालक व पोलीस महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, मुंबई
- महालेखापाल - १ (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा ), महाराष्ट्र राज्य, मुंबई
- अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
- निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
- गृह विभागातील सर्व कार्यासने
- वित्त विभाग/ व्यय-७, मंत्रालय, मुंबई
- लेखा अधिकारी, भापोसे कक्ष, गृह विभाग
- निवड नस्ती